<u>सुधारित वेतनश्रेणीस अनुसरुन आस्थापना मंडळाच्या कार्यकक्षेतील पदे ठरविण्याबाबत.</u>

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक, क्रमांक: ईएसबी-११०९/प्र.क्र.४०/०९/१३,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १ डिसेंबर,२००९.

वाचा : १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : ईएसबी-१०८४/प्र.क्र.३८/१३, दि.१९.५.१९८७.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : ईएसबी-१०८९/प्र.क्र.६/१३, दि.३.२.१९८९.
३) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : ईएसबी-१०८९/प्र.क्र.३७/१३, दि.२५.४.१९८९.
४) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: ईएसबी-१०८९/प्र.क्र.३७/१३, दि.११.१२.१९८९.
५) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: ईएसबी-१०९९/प्र.क्र.२९/१३, दि.२०.४.१९९९.

<u>शासन निर्णय :</u>

उपरोक्त दि.२०.४.१९९९ च्या शासन निर्णयान्वये, शासन सेवेतील ज्या पदांच्या वेतनश्रेणीचा किमान टप्पा रु.१२,००० ते १५,०००/- या वेतनश्रेणीतील आहे. अशा सर्व पदांवरील पदोन्नत्यांसाठी अधिकाऱ्यांची निवड करण्याची बाब आस्थापना मंडळ क्र.२ च्या कार्यकक्षेत येईल व ज्या पदांच्या वेतनश्रेणीचा किमान टप्पा रु.१६४०० वा त्यापेक्षा जास्त आहे अशा राज्य शासन सेवेतील सर्व पदांवरील पदोन्नतीसाठी अधिकाऱ्यांची निवड करण्याची बाब आस्थापना मंडळ क्र.१ च्या कार्यकक्षेत राहील असे आदेशित करण्यात आले होते.

शासन अधिसुचना वित्त विभाग क्र.वेपुर-१२०९/प्र.क्र.२७/सेवा-९, दि.२२/०४/२००९ अन्वये शासकीय कर्मचारी/ अधिकारी यांना सुधारित वेतनश्रेणी लागू करण्यात आल्या आहेत. त्यानुसार प्रत्येक पदांसाठी पे-बँड (+) ग्रेड पे देण्यात आले आहे. सदर सुधारित वेतनश्रेणी विचारात घेऊन आस्थापना मंडळाच्या कार्यकक्षेतील पदे ठरविण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. शासनाने याबाबत असा निर्णय घेतला आहे की, ज्या पदांच्या वेतनश्रेणीचा किमान सुधारित टप्पा पे-बँड रु.१५,६००-३९,१०० अधिक ग्रेड पे रु.७,६००/- व त्यावरील श्रेणीत आहे अशा सर्व पदांवरील पदोन्नतीसाठी अधिकाऱ्यांची निवड करण्याची कार्यवाही आस्थापना मंडळ क्र.२ च्या कार्यकक्षेत येईल.

तसेच ज्या पदांच्या सुधारित वेतनश्रेणीचा किमान टप्पा रु.३७,४००-६७,००० अधिक ग्रेड पे रु.८,९००/- व त्यापेक्षा अधिक या वेतनश्रेणीत आहे अशा सर्व पदांवरील पदोन्नतीसाठी अधिकाऱ्यांची निवड करण्याची कार्यवाही आस्थापना मंडळ क्र.१ च्या कार्यकक्षेत येईल.

तरी मंत्रालयाच्या सर्व प्रशासकीय विभागांनी आस्थापना मंडळाच्या विचारार्थ पाठवावयाचे प्रस्ताव, पदोन्नतीने भरावयाचे पद रिक्त होण्याच्या किमान तीन महिने अगोदर विहित नमुन्यात सामान्य प्रशासन विभागाकडे स्वतंत्र गोपनीय पत्राद्वारे पाठवावेत.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २००९१२१०१२१९२१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

म.चि.पाटील

( मं.चि.पाटील )

**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,

मुख्यमंत्र्याचे सचिव, मंत्रालय, मुंबई,

सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)

सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना कक्ष-सर्व आस्थापना कक्षांनी सदर आदेश त्या त्या विभागाच्या प्रशासकीय कार्यालयांच्या निदर्शनास आणून द्यावे)

सामान्य प्रशासन विभाग (का.क्र.८, ११-अ, १२-अ, १३-अ,१४, १५, १६-ब, १९, २०-अ, २०-ब, २१,२८, २८-अ, ३१, ३४-अ, ३७, ३८, मंत्रालय उपहारगृह कार्यालय, निवास व्यवस्था नियंत्रक, विज्ञान व तंत्रज्ञान कक्ष)